दिनांक ०३ जानेवारी ते २६ जानेवारी, २०१७ या कालावधीत शाळांमध्ये "ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले लेक शिकवा" अभियान राबविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३७३-एस.डी.४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक:- ३० डिसेंबर, २०१६**

परिपत्रक:

"विद्या हे धन आहे रे, श्रेष्ठ साऱ्या धनाहून, तिचा साठा जयापासी, आहे तो खरा धनवान" अशा शब्दात शिक्षणाचे महत्व सांगून स्त्री शिक्षणासाठी अहोरात्र सावित्रीबाई फुले यांनी जे कार्य केले त्याला जगाच्या इतिहासात तोड नाही. अज्ञान, अनिष्ट रुढी व परंपरांच्या विळख्यात गुरफटलेल्या समाजात स्त्रीकडे तुच्छ व उपभोग्य वस्तु म्हणून पाहिले जात होते. अशा काळात समाजाची वक्रदृष्टी स्वीकारुन स्त्रीयांना चूल व मूल यातून बाहेर काढण्यासाठी ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले यांनी पुण्यात मुलींसाठी पहिली शाळा काढून सामाजिक परिवर्तन चळवळीचा पाया घातला. सावित्रीबाई यांच्या महान शैक्षणिक कार्याची ओळख शाळांतील विद्यार्थ्यांना व्हावी व त्यांच्या कार्याची प्रेरणा मिळावी यासाठी राज्यातील सर्व शाळांमधून "ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले लेक शिकवा अभियान" राबविण्याचा निर्णय घेतला आहे. हे अभियान दरवर्षीप्रमाणे ०३ जानेवारी ते २६ जानेवारी, २०१७ या कालावधीत आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या मार्गदर्शनाखाली राबविण्यात यावे.

बालकाचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम,२००९ नुसार प्रत्येक बालकास समान गुणवत्तेचे मोफत व सक्तीचे प्राथमिक शिक्षण देण्याची कायदेशीर तरतूद करण्याची जबाबदारी राज्य शासनास सोपविली आहे. त्यानुसार राज्यात मुलींना शिक्षण घेण्यासाठी प्रोत्साहित करण्यासाठी, मुलींच्या शिक्षणाला गती मिळावी, एकही मुलगी शिक्षणापासून वंचीत राहू नये, मुलींच्या शिक्षणाला प्रतिष्ठा आणि गुणात्मक दर्जाचे अधिष्ठान लाभावे, परिस्थितीमुळे मुलींच्या शिक्षणात खंड पडू नये, शाळाबाह्य मुलींना शिक्षणाच्या मुख्य प्रवाहात आणण्यासाठी विशेष प्रयत्न करणे, स्थलांतरीत पालकांच्या मुलींच्या अखंडीत शिक्षणाची हमी देणे, मुलींना शिक्षणांची प्रेरणा देणे, त्यांच्यात आत्मविश्वास रुजविणे, वैचारिक व तार्किक क्षमता निर्माण करणे, शारीरिक क्षमता वाढीस लावणे, त्यांच्या सृजनशिलतेस वाव देणे तसेच विशेष करुन माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षणातील विद्यार्थीनींची गळती कमी होणे यासाठी "ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले लेक शिकवा" अभियानांतर्गत विविध कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावे.

**ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले यांनी ज्या उद्देशाने स्त्री शिक्षणास सुरुवात केली तो उद्देश केंद्रीभूत ठेऊन "लेक शिकवा" या अभियानांतर्गत कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावे.**

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१६१२३०१६१४४६५७२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2016.12.30 16:21:11 +05'30'

**(डॉ.सुवर्णा सि.खरात)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मंत्री, शालेय शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. आयुक्त (शिक्षण), आयुक्त शिक्षण यांचे कार्यालय,
४. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. आयुक्त महानगरपालिका (सर्व),
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व),
८. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
९. शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/निरंतर),जिल्हा परिषद (सर्व),
१०.शिक्षणाधिकारी/शिक्षण प्रमुख/प्रशासन अधिकारी, महानगरपालिका (सर्व),
११.निवड नस्ती (एस.डी.४) कार्यासन.